शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, परभणी या संस्थेकरिता जमिनीचे रेडीरेकनर मूल्य रु.२३४.९१ लक्ष इतकी रक्कम उद्योग विभाग / मराठवाडा विकास महामंडळ, औरंगाबाद यांना पुस्तकी समायोजनाने अदा करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग
शासन निर्णय क्रमांकः एमईडी-२०२०/प्र.क्र.१९ (भाग-अ)/२०/शिक्षण-१
९ वा मजला, गो.ते.रुग्णालय संकुल, नविन मंत्रालय, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई ४०० ००१.
दिनांक:- २८.०३.२०२३.

वाचा:-

१) मा.मंत्रीमंडळाच्या बैठकीतील निर्णय दि.०२.०३.२०२२
२) शासन निर्णय क्रमांकः एमईडी-२०२०/प्र.क्र.१९/२०/शिक्षण-१ , दि. २८.०३. २०२२.
३) मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील दि.०५.१२.२०२२ च्या बैठकीचे इतिवृत्त.

प्रस्तावना :

परभणी येथे १०० विद्यार्थी प्रवेश क्षमतेचे नवीन शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व त्यास संलग्नित ४३० रूग्णखाटांचे रूग्णालय स्थापन करण्याच्या प्रस्तावास दिनांक ०२.०३.२०२२ रोजीच्या मा. मंत्रीमंडळाच्या बैठकीत मान्यता देण्यात आली असून त्यानुषंगाने दिनांक २८.०३.२०२२ रोजी शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे.

२. परभणी येथील नवीन शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व त्यास संलग्नित रूग्णालयाकरिता मौजे ब्रम्हपुरी, ता. जि. परभणी येथील उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या अखत्यारीतील गट क्र. २, २०, ४७, ५३ येथील एकूण ५२.०६ हे. आर. इतकी जमीन महसूल विभागामार्फ़त वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागास निःशुल्क हस्तांतरीत करण्यास मा.मंत्रीमंडळाने मान्यता दिली आहे. तथापि, सदर प्रकल्पासाठी प्रस्तावित असलेली ५२.०६ हे. आर. जमीन ही उद्योग विभागाच्या अखत्यारीत असून मराठवाडा विकास महामंडळाची दुय्यम कंपनी- परभणी कृषी गोसंवर्धन मर्यादित यांच्या नावे असल्याचे निर्दशनास आले आहे.

३. दरम्यानच्या कालावधीत सदर प्रकल्पासाठी प्रस्तावित ५२.०६ हे.आर. जमिनीऐवजी २० हे. आर जमीन उपलब्ध करून देण्याची विनंती जिल्हाधिकारी, परभणी यांनी केली होती. प्रस्तावित २० हे. आर जागेच्या हस्तांतरणाबाबत वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग व उद्योग विभाग यांच्यात उपस्थित झालेल्या मुद्यांच्या अनुषंगाने मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांच्या अध्यक्षतेखाली दिनांक ०५.१२.२०२२ रोजी बैठक झाली. सदर बैठकीत झालेल्या निर्णयानुसार प्रस्तावित जमिनीचे रेडीरेकनर मूल्य रु. २३४.९१ लक्ष इतकी रक्कम पुस्तकी समायोजनाद्वारे उद्योग विभागास अदा

करण्यासाठी उद्योग विभाग तसेच वित्त विभागाचीदेखील सहमती प्राप्त झाली आहे. यानुषंगाने शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, परभणी या संस्थेकरिता जमिनीचे रेडीरेकनर मूल्य रु.२३४.९१ लक्ष इतकी रक्कम मराठवाडा विकास महामंडळ, औरंगाबाद व दुय्यम कंपन्यांच्या दायित्व रकमेपोटी उद्योग विभागास पुस्तकी समायोजनाने अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

परभणी येथील नवीन शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व संलग्नित रुग्णालयाकरिता उद्योग, ऊर्जा व कामगार विभागांतर्गत मराठवाडा विकास महामंडळ यांची दुय्यम कंपनी परभणी कृषी गो संवर्धन मर्यादित यांच्या नावे असलेली मौजे ब्राम्हणगाव, तालुका परभणी, जिल्हा परभणी येथील गट क्र. ३०९ मधील ८.४२ हेक्टर आर व गट क्र. १५५ मधील ७.७५ हेक्टर आर आणि मौजे ब्रम्हपूरी तर्फे लोहगाव, तालुका परभणी, जिल्हा परभणी येथील गट क्र. ०२ मधील ३. ८३ हेक्टर आर अशी वापरास योग्य असलेल्या एकूण २० हे. आर. इतक्या जमिनीचे रेडीरेकनर मूल्य रु.२३४.९१ लक्ष इतकी रक्कम उद्योग विभाग / मराठवाडा विकास महामंडळ, औरंगाबाद यांना पुस्तकी समायोजनाने अदा करण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

२. सदर रक्कम वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभागाच्या, "मागणी क्र. एस-३, २२५१- सचिवालय सामाजिक सेवा, ०९०- सचिवालय, (००) (०१)- वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग (अनिवार्य), २८- व्यावसायिक सेवा, (२२५१०२०२)" या लेखाशिर्षाखाली पुस्तकी समायोजनाने खर्च दाखविण्यात यावी व उद्योग विभागाच्या, "६८८५- उद्योग व खनिजे यासाठी इतर कर्जे, ०२-मागास क्षेत्र विकास, १९०-सार्वजनिक क्षेत्रे व इतर उपक्रम यांना कर्जे, (०२) विकास महामंडळांस कर्जे, (०२) (०३) राज्य शासनाने प्रोत्साहन योजनांसाठी दिलेल्या कर्जाची मराठवाडा विकास महामंडळाकडून परतफेड, (६८८५५१४२०१)" या लेखाशिर्षाखाली पुस्तकी समायोजनाने जमा दाखविण्यात यावी. सदर पुस्तकी समायोजन सन २०२२-२०२३ या वर्षाच्या अर्थसंकल्पिय तरतुदीतून करण्यात यावे.

३. आहरण व संवितरण अधिकारी, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय (खुद्द), मुंबई यांनी उपरोक्तनुसार पुस्तकी समायोजनाचे "निरंक" रकमेचे देयक अधिदान व लेखा कार्यालयास सादर करावे.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक ५७ /व्यय १३, दिनांक ०३.०२.२०२३ अन्वये प्राप्त झालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३२८२००१३०९७१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

AJIT TUKARAM SASULKAR

Digitally signed by AJIT TUKARAM SASULKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=09df106c443b4977e7463338fa58f736fdb4fe137863b178345a5ead34dbfb12, pseudonym=8433B0910FFD44AC77C267452786D497C8BC73E0, serialNumber=71214F99804ABAAE1EA28D5F794C1BA337889880D0C567C29D025934340956DF, cn=AJIT TUKARAM SASULKAR
Date: 2023.03.30 11:19:30 +05'30'

**(अजित सासुलकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राज्यपाल सचिवालय, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई.
३. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई.
४. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा.मंत्री,वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
७. मा.मंत्री (सर्व), महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे सचिव, विधानभवन, मुंबई.
९. मा.विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानसभा यांचे सचिव, विधानभवन, मुंबई.
१०. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
११. अ.मु.स., वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. प्र.स., (उद्योग) उद्योग, उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण, मुंबई.
१४. जिल्हाधिकारी, परभणी
१५. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.
१६. कुलसचिव, महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक
१७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र राज्य (मुंबई/ नागपूर)
१८. महालेखापाल (लेखा व परीक्षा) १/२, महाराष्ट्र राज्य (मुंबई/ नागपूर)
१९. वित्त विभाग (व्यय १३/अर्थ-९) , मंत्रालय, मुंबई
२०. उपसचिव (अलेप/प्रशा.), वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई
२१. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
२२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
२३. कार्यासन अधिकारी (रोख शाखा /अलेप), वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय
२४. निवडनस्ती (शिक्षण-१)